आदिवासी घटक कार्यक्रम सन २०२१-२२ या वर्षात अनुसूचित जमाती प्रवर्गातील विद्यार्थ्यांना शिक्षण फी व परीक्षा फी प्रदाने करण्यासाठी निधी वितरण.
(लेखाशीर्ष २२२५ एफ ०९४)

महाराष्ट्र शासन
आदिवासी विकास विभाग
शासन निर्णय क्रमांकः बीयुडी-२०२१ /प्र.क्र. ०२/ कार्यासन ६
मंत्रालय विस्तार, मुंबई ४०० ०३२.
दिनांक : २४ नोव्हेंबर, २०२१.

वाचा :-

१) वि. वि, शासन परिपत्रक क्र.अर्थसं-२०२१ /प्र.क्र.४८/ अर्थ-३, दि.२४.०६.२०२१ व दि.१४.१०.२०२१.
२) आदिवासी विकास विभाग समक्रमांकित शासन निर्णय, दि.१८.६.२०२१, दि.९.७.२०२१ व दि.१५.९.२०२१.
३) शासन ज्ञापन क्र.पुनर्वि-२०२१/प्र.क्र.९९/का-६, दि.२४ .११. २०२१.
४) आदिवासी विकास विभाग, नस्ती क्रअर्थसं-२०२१/प्र.क्र. ५१ (भाग-१)/कार्या-१२.

**प्रस्तावना :-**

आदिवासी घटक कार्यक्रमांतर्गत आदिवासी विद्यार्थ्यांना देण्यात येणारे शिक्षण शुल्क, व परीक्षा शुल्क या योजनांतर्गत सन २०२०-२१ या शैक्षणिक वर्षाअखेर प्रलंबित शुल्क अदा करण्यासाठी संदर्भाधीन क्र.२ येथील शासन निर्णयान्वये एकूण रु.६०००.०० लाख इतका निधी वितरीत करण्यात आला आहे. आता या योजनेंतर्गत सन २०२०-२१ पर्यंत प्रलंबित शुल्कासाठी निधी उपलब्ध करुन देण्यास मंजुरी देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

आदिवासी घटक कार्यक्रम अंतर्गत मागणी क्र.टी-५ मधील २२२५-अनुसूचित जाती, अनुसूचित जमाती, इतर मागासवर्ग व अल्पसंख्यांक यांचे कल्याण या मुख्य लेखाशीर्षाखाली आदिवासी विद्यार्थ्यांना शिक्षण शुल्क व परीक्षा शुल्क या योजनेसाठी सन २०२१-२२ या आर्थिक वर्षात **पुनर्विनियोजनाद्वारे** खालीलप्रमाणे निधी वितरीत व खर्च करण्यास मान्यता देण्यात येत आहे :-

(रु. लाखात)

| योजना | बाब | सन २०२१-२२ मधील अर्थसंकल्पित तरतूद | यापुर्वी वितरीत तरतुद | सदर शासन निर्णयान्वये वितरीत करण्यात येत असलेली तरतूद |
|---|---|---|---|---|
| शिक्षण शुल्क व परीक्षा शुल्क प्रदाने (२२२५ एफ ०९४) | ३४-शिष्यवृत्ती/ विद्यावेतने | ६०००.०० | ६०००.०० | २७६८.९५३७९ |

२. उपरोक्त प्रमाणे **एकूण रु.२७६८.९५३७९ लाख (अक्षरी रुपये सत्तावीस कोटी अडुसष्ठ लाख पंच्यान्नव हजार तीनशे ऐकोनऐंशी फक्त)** इतका निधी नियंत्रक अधिकारी तथा आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक यांना अर्थसंकल्पीय वितरण प्रणालीवर वितरीत व खर्च करण्यास याद्वारे शासनाची मान्यता देण्यात येत आहे. सदर निधीचा वापर फक्त सन २०१८-१९ ते सन २०२०-२१ या कालावधीतील विद्यार्थ्यांच्या प्रलंबित शिक्षण शुल्क व परिक्षा शुल्क अदा करण्यासाठीच करण्यात यावा. प्रकरणी विभागप्रमुख /नियंत्रण अधिकारी यांनी सदर तरतुद खर्च करताना महाराष्ट्र अर्थसंकल्प नियमपुस्तिका, वित्तीय अधिकार नियमपुस्तिका यामधील वित्तीय नियम तसेच वित्त विभागाच्या संदर्भाधीन दि.२४.०६.२०२१ व दि.१४.१०.२०२१ च्या शासन निर्णयातील दिलेल्या निर्देशांचे काटेकोरपणे पालन करावे. सदर तरतूद शिष्यवृत्ती योजनेच्या मार्गदर्शक सूचनास अनुसरुन खर्च करण्याची दक्षता घेण्यात यावी.

३. सदर उपलब्ध करुन दिलेल्या तरतूदीतून झालेल्या खर्चाचा अहवाल, लेखाशिर्षनिहाय / उपलेखाशिर्षनिहाय साध्य झालेले भौतिक उद्दिष्टाबाबतची माहिती, निधी उपयोगिता प्रमाणपत्र इ. माहिती आदिवासी विकास विभागास यांना प्रत्येक महिन्याच्या १० तारखेपर्यंत पाठवावी. नियंत्रण अधिकारी व विभाग प्रमुख यांनी आदिवासी उपयोजना क्षेत्रात, आदिवासी उपयोजना बाह्य क्षेत्रात केलेला खर्च स्वतंत्रपणे नोंदविला जाईल याची दक्षता घ्यावी, जेणेकरुन शासनाला आदिवासी क्षेत्रातील व उपयोजना क्षेत्राबाहेरील योजनांवर होणाऱ्या खर्चावर संनियंत्रण ठेवता येईल.

४. सदर शासन निर्णय वित्त विभागाच्या वाचा क्र.१ अन्वये विभागास प्रदान केलेल्या अधिकारान्वये तसेच वित्त विभाग अनौपचारिक संदर्भ क्र.९५५/व्यय-१४, दि.२७.१०.२०२१ अन्वये दिलेल्या मंजुरीस अनुसरुन निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०२१११२४१५३८२९९३२४ असा आहे. सदर आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

KIRAN KISANRAO PAWAR

Digitally signed by KIRAN KISANRAO PAWAR
DN: c=IN, o=GOVERNMENT OF MAHARASHTRA, ou=TRIBAL DEVELOPMENT DEPARTMENT, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=68d8b19f123ba59448c0926a91296205b9a87463f831a2beea0be5cb381a34e8, pseudonym=4D88F77C99929CC895AC64CF186BB11E7252442D, serialNumber=344DE3FF07B9439DD11CAF728255A5EB0A0DD495EF82F989931088637D8211C0, cn=KIRAN KISANRAO PAWAR
Date: 2021.11.24 17:28:25 +05'30'

( किरण कि. पवार )
कार्यासन अधिकारी, महाराष्ट्र शासन

**प्रत,**

१. मा.मंत्री, आदिवासी विकास यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
२. मा.राज्यमंत्री, आदिवासी विकास यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई.
३. आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक.

४. अपर आयुक्त, आदिवासी विकास, ठाणे/नाशिक/नागपूर/अमरावती
५. महालेखापाल (लेखापरिक्षा)/(लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.
६. सर्व प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प,
७. ग्रंथपाल, महाराष्ट्र राज्य विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई
८. वित्त विभाग (अर्थसंकल्प-१९/अर्थोपाय), मंत्रालय, मुंबई.
९. अधिदान व लेखाधिकारी, मुंबई
१०. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी.
११. उपसचिव / कक्ष अधिकारी (का-१२), आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
१२. निवड नस्ती (का.६), आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.